**राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियान (NMMI) अंतर्गत**
**सन २०१२-१३ मधील प्रलंबित प्रकरणे**
**निकाली काढण्यासाठी रु.७२.०० कोटी एवढा**
**निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुसिंयो-२११४/प्र.क्र.१६२/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: ७ फेब्रुवारी, २०१५

**वाचा**

**१) शासन निर्णय क्रमांकः एसडिआय-१६१२/प्र.क्र.१०९/४-अे, दिनांक २८/०९/२०१२**

**प्रस्तावना**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन योजना सन २००५-०६ पासून राज्यात राबविण्यात येत होती. ११ व्या पंचवार्षिक योजनेमध्ये केंद्र शासनाने सदर योजना राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियान म्हणून राबविण्याचे निश्चित केले. त्यानूसार सूक्ष्म सिंचन योजना, राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियानांतर्गत सन २०१३-१४ पर्यंत राबविण्यात येत होती. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ८०:२० असे होते. केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये राष्ट्रीय सूक्ष्म सिंचन अभियान शाश्चत शेती अभियानांतर्गत शेतावरील पाणी व्यवस्थापन उपअभियान (OFWM) म्हणून राबविण्याचे निश्चित केले आहे.

शेतकऱ्यांमध्ये सूक्ष्म सिंचनाबाबत जागृती निर्माण झाल्याने मोठ्या प्रमाणावर प्रस्ताव प्राप्त होऊ लागलेत. शेतकऱ्याकडून होणारी मागणी विचारात घेऊन त्याप्रमाणात राष्ट्रीय सूक्ष्म सिंचन अभियानाचा कृती आराखडा केंद्र शासनास सादर करण्यात येत होता. तथापि, केंद्र शासनाकडून मागणीच्या प्रमाणात आराखड्यास मान्यता प्राप्त होत नव्हती. त्यामुळे प्रत्येक वर्षी प्रस्ताव प्रलंबित राहत होते. प्रत्येक वर्षी प्राप्त होणारा निधी हा मागील वर्षाचे प्रलंबित प्रस्ताव निकाली काढण्यासाठी वापरण्यात येत होता.

केंद्र शासनाकडून मागणीच्या प्रमाणात पुरेसा निधी प्राप्त होत नसल्याने राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियानाशी समांतर, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार १००% राज्य पूरस्कृत योजना राबविण्याचा निर्णय राज्य शासनाने दिनांक १५ जुलै, २०१३ च्या शासन निर्णयान्वये घेतला.

सन २०१२-१३ या वर्षामध्ये रु. ५६९.००८८ कोटी एवढ्या रकमेचा कार्यक्रम राबविण्यात आला. त्या वर्षामध्ये केंद्र शासनाकडून रु.१३१.०४ कोटी एवढा निधी प्राप्त झाला. सदरचा निधी व त्याप्रमाणात राज्य हिश्श्याचा निधी सन २०११-१२ मधील प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्यासाठी वापरण्यात आला. त्यामुळे सन २०१२-१३ या वर्षासाठी निधी उपलब्ध होऊ शकला नाही. सन २०१३-१४ मधील केंद्र

शासनाकडून प्राप्त झालेला रु. १२२.७७६० कोटी व त्याप्रमाणात राज्य हिश्श्याचा रु. २८.६६७० कोटी असा एकुण रु.१५१.४४३० कोटी एवढा निधी सन २०१२-१३ मधील प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्यासाठी वापरण्यात आला. सदर निधी वजा जाता मार्च, २०१४ अखेर रु.४१७.५६५७ कोटी एवढ्या निधीचे प्रस्ताव प्रलंबित होते. त्यापैकी रु.३३२.४३१० कोटी एवढा निधी केंद्र हिश्श्याचा आहे व रु.८५.१३४८ कोटी एवढा निधी राज्य हिश्श्याचा आहे. राज्य हिश्श्याचा निधी जिल्हा स्तरावर (DPDC) उपलब्ध आहे. केंद्र हिश्श्यापोटी द्यावयाच्या अनुदानाची रक्कम रु.३३२.४३१० कोटी राज्य शासनाने उपलब्ध करुन द्यावयाची आहे. त्यापैकी रु.२१२.४३१० कोटी एवढ्या निधीची तरतूद जून २०१४ च्या अधिवेशनात पूरवणी मागणीद्वारे करण्यात आली आहे. उर्वरीत रु. १२०.०० कोटी एवढा निधी ग्रामीण पायाभूत विकास निधी मालिका-२० अंतर्गत नाबार्डकडून मंजूर झालेल्या कर्जातून उपलब्ध होणार आहे. सदर कर्जासाठी सन २०१४-१५ या वर्षात जून २०१४ च्या अधिवेशनात रुपये १२० कोटी एवढया रकमेची तरतूद नवीन बाबीद्वारे करण्यात आली आहे. सदर नवीन बाबीद्वारे मंजूर तरतुदीपैकी वित्त विभागाच्या दिनांक ०१ जुलै, २०१४ च्या परीपत्रकानूसार ६०% म्हणजेच रु.७२.०० कोटी एवढा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

राष्ट्रीय सूक्ष्म सिंचन अभियानांतर्गत सन २०१२-१३ मधील प्रलंबित प्रस्ताव निकाली काढण्यासाठी रु.७२.०० कोटी (अक्षरी रु. बहात्तार कोटी फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२ सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व जून २०१४ च्या अधिवेशनात नवीन बाबीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणीक्र. D-३**

**२४०१, पीकसंवर्धन**

**११९, बागायती व भाजीपाला पिके**

**(०३) रोपमळे**

**(०३) (३५) १००% राज्य पूरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना**

**(केंद्र पुरस्कृत सूक्ष्म सिंचन अभियानाच्या समांतर)**

**(२४०१ ९४४७)**

**३३-अर्थसहाय्य**

३. सुक्ष्म सिंचन संच प्रत्यक्षात बसविले आहेत, अनुदानाची दोनदा मागणी केली जात नाही या सर्व बाबींची सखोल तपासणी केल्यानंतरच हा निधी प्रत्यक्ष संबंधित शेतक-यांच्या खात्यात थेट जमा करण्यात यावा.

४. ज्या शेतक-यांना हे अनुदान दिले जाणार आहे त्यांच्या नावाची यादी ग्रामपंचायत / चावडी व शासनाच्या संकेतस्थळावर (वेबसाईटवर) प्रसिध्द करावी.

५. सदर निधी खर्च करताना राष्ट्रीय सूक्ष्म सिचंन अभियानाच्या मार्गदर्शक सुचना, संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयाचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. सदर निधी खर्च करताना राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय/परीपत्रके याचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. मंजूर केलेला निधी खर्च करण्यास लेखा अधिकारी (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून या योजनेचा खर्च मासिक कॅश फ्लो च्या मर्यादेत राहिल याची दक्षता घेण्याची व संगणकीय अर्थसंकल्पिय प्रणालीद्वारे वितरीत करण्याची जबाबदारी कृषि संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहिल.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक १४/२०१५/व्यय-०१ दिनांक ५ फेब्रुवारी, २०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व मा.अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०९१२२९००७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madan Umesh M

Digitally signed by Madan Umesh M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Umesh M
Date: 2015.02.09 12:38:33 +05'30'

**(उ. म. मदन)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

२) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

३) मा.अ.मु.स. (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक

४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई.

५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला

६) जिल्हाधिकारी (सर्व)

७) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)

८) मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे

९) सर्वसंचालक, कृषिआयुक्तालय, महाराष्ट्रराज्य, पुणे

१०) सर्व विभागीय कृषि सहसंचालक

११) प्रधान सचिव (रोहयो व जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग मंत्रालय,मुंबई-३२

१२) जिल्हाअधिक्षककृषिअधिकारी (सर्व)

१३) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)

१४) सर्व कृषि विकास अधिकारी / सर्व उपविभागीय कृषि अधिकारी / सर्व तालुका कृषि अधिकारी/ सर्व मंडळ कृषि अधिकारी

१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षण) महाराष्ट्र -१/२मुंबई/नागपुर

१७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई

१८) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई

१९) मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.

२०) उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर

२१) उपसंचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर

२२) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२

२३) निवडनस्ती.